**कोरेगांव भिमा (जि.पुणे) येथे दि. १.१.२०१८ रोजी घडलेल्या घटनेच्या अनुषंगाने व मराठा आरक्षणा संबंधात झालेले आंदोलन यासंदर्भात दाखल झालेले खटले मागे घेण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पीआरओ-०४१८/प्र.क्र. १४२/विशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २६ ऑक्टोंबर, २०१८.

**वाचा :** १) शासन निर्णय क्र. पीआरओ- ०११४/प्र.क्र. १२०/विशा-२, दि. १४ मार्च, २०१६.
२) विशेष पोलीस महानिरिक्षक (का. व सु.), मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२०/१९९/मराठा क्रांती मोर्चा/ २४७/२०१७, दि. २७.८.२०१८
३) अपर पोलीस महानिरिक्षक (का. व सु.), मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२०/१९५/भिमा कोरेंगाव-गुन्हे दाखल/१३५/२०१७, दि. १२.९.२०१८.
४) अपर पोलीस महानिरिक्षक (का. व सु.), मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२०/१९५/भिमा कोरेंगाव-गुन्हे दाखल/१३५/२०१७, दि. १.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक हिताच्या निरनिराळया समस्यांकडे शासनाचे लक्ष वेधण्यासाठी राजकीय व सामाजिक संघटना यांच्यामार्फत बंद पुकारणे, घेराव घालणे, मोर्चा काढणे, निदर्शने करणे, इत्यादी प्रकारचे आंदोलनाचे मार्ग अनुसरले जातात. त्यामुळे त्यांच्याविरुध्द प्रतिबंधात्मक आदेशाचे उल्लंघन केल्याबद्दल गुन्हे दाखल करण्यात येतात व न्यायालयात आरोपपत्र दाखल करुन खटले भरण्यात येतात. सदर खटले वर्षानुवर्ष चालू रहात असल्याने ते खटले मागे घेण्याबाबत शासनास विनंती अर्ज प्राप्त होत असतात. अशा खटल्यांची तपासणी करुन ते मागे घेण्याची कार्यपध्दती उपरोक्त संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे.

भीमा- कोरेगांव येथे जानेवारी-२०१८ मध्ये घडलेल्या घटनेच्या अनुषंगाने झालेल्या विविध आंदोलनात दाखल झालेले खटले मागे घेण्याबाबत शासनास निवेदने / विनंती अर्ज प्राप्त झालेली आहेत. तसेच जुलै-ऑगस्ट २ ०१८ दरम्यान मराठा आरक्षणा संदर्भात झालेल्या आंदोलनाच्या अनुषंगाने दाखल करण्यात आलेले खटले मागे घेण्याबाबत देखील शासनास विनंती अर्ज/निवेदने प्राप्त झालेली आहेत. सदर घटनेच्या अनुषंगाने दाखल झालेल्या खटल्यांची शहानिशा करुन ते मागे घेण्याच्या संदर्भात योग्य ती कार्यवाही करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

आता शासनाने वरील घटनांच्या अनुषंगाने खटले मागे घेण्याबाबत उचित कार्यवाही करण्यासाठी खालील प्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

| | | |
|---|---|---|
| **१) अपर पोलीस महासंचालक (का. व सु.), महाराष्ट्र राज्य, मुंबई** | : | **अध्यक्ष** |
| **२) पोलीस महानिरिक्षक** | : | **सदस्य** |
| **३) पोलीस महानिरिक्षक** | : | **सदस्य** |

२. उपरोक्त घटनांच्या संदर्भात खटले मागे घेण्याच्या संदर्भात उचित कार्यवाही करण्यासाठी आवश्यक अटी खालील प्रमाणे राहतील :-

१) **अशा घटनेत जिवित हानी झालेली नसावी आणि,**

**२) अशा घटनेत खाजगी व सार्वजनिक मालमत्तेची रु. १०,००,०००/-पेक्षा जास्त हानी झालेली नसावी**.

३) **पोलीसांवर थेट हल्ला करणाऱ्यांवरील केसेस मागे घेता येणार नाही. याकरीता व्हिडीओ फुटेज तपासण्यात येईल.**

३. प्रस्तुत प्रकरणी खालील प्रमाणे कार्यवाही करावी.

१. अपर पोलीस महासंचालक (का.व सु.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील समितीमध्ये असलेल्या वरील दोन पोलीस महानिरिक्षकांची निवड पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे करतील.सदर समिती सर्व पोलीस आयुक्त व सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक यांच्याकडून माहिती घेईल व त्यावर उचित कार्यवाही करुन स्वयंस्पष्ट शिफारशीसह शासनास अहवाल सादर करावा.

२. शासनास (गृह विभागास) प्राप्त झालेला अहवाल मंत्रिमंडळ उपसमिती पुढे निर्णयार्थ सादर करण्यात येईल.

३. सदर आंदोलनात सार्वजनिक मालमत्तेची हानी रु. १०,००,०००/- झाली असल्यास समितीने स्वत:हुन अशा प्रकरणाची तपासणी करावी. सदर खटला काढून घेणे योग्य असल्याचे समितीचे मत असल्यास समितीने त्याबाबत संबंधितास कळवावे. सदर नुकसान भरपाईची रक्कम भरणेबाबत त्यांची लेखी संमती असल्यास सदर खटले काढून घेण्याबाबत समिती विचार करेल.

४. एक पेक्षा अधिक व्यक्ति असल्यास ही रक्कम समप्रमाणात अथवा सर्व सहमतीने वसुल करण्यात यावी. तसेच पैस भरले याचा अर्थ गुन्हा शाबीत झाला किंवा मान्य झाला असा अर्थ लावण्यात येऊ नये.

५. खाजगी व सार्वजनिक मालमत्तेची रु. १०,००,०००/- पर्यंत झालेली नुकसान भरपाईची रक्कम पुढील लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी.

०५५-पोलीस, ००-पोलीस, १०३-फी, दंड व जप्तीच्या रक्कमा,०२- नुकसान भरपाई, (०२)(०१) राजकीय व सामाजिक आंदोलनात झालेली सार्वजनिक व खाजगी मालमत्तेची नुकसान भरपाई (००५५०३६२).

६. सदर शासन निर्णय विधि व न्याय विभागाच्या मान्यतेने व त्याच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८२६-PS, दि. २४/१०/२०१८ अन्वेय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८१०२६१४५६४७५१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghate Pradnya Pratap

Digitally signed by Ghate Pradnya Pratap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=57611b4c6ed68a5d541b6a918f9b3bd8c1e23b496a5945 6c8dcc655db6800dfb, serialNumber=739012ac0875c28b3217140ad9b5d45792ca5a81f5f b7de248ec16513429037e, cn=Ghate Pradnya Pratap
Date: 2018.10.26 15:41:20 +05'30'

( प्रज्ञा घाटे )

कक्ष अधिकारी, गृह विभाग.

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१) मा.राज्यपाल याचे सचिव
२) अपर मुख्य सचिव, मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय
३) मा.राज्यमंत्री,गृह(ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
४) मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
५) अपर मुख्य सचिव(गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१०) प्रधान सचिव(विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) सचिव, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) सर्व जिल्हादंडाधिकारी
१३) सर्व पोलीस आयुक्त (लोहमार्गासह)
१४) सर्व पोलीस अधिक्षक
१५) सर्व अतिरिक्त जिल्हा पोलीस अधिक्षक
१६) संचालक, सरकारी अभियोक्ता संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७) सर्व पोलीस सह/ उप आयुक्त (गुन्हे)
१८) सर्व सहायक संचालक व सरकारी अभियोक्ता
१९) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) अध्यक्ष, इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई
२१) अध्यक्ष, नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई
२२) अध्यक्ष, भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक नं.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भगवान चौक, नरीमन पाईंट, मुंबई
२३) अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४ राजभवन, एस व्ही पटेल रोड, मुंबई
२४) अध्यक्ष, भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई.

२५) अध्यक्ष, राष्ट्रीय जनता दल (से.) एल.आय.सी. इमारतीसमोर, मुंबई
२६)अध्यक्ष, बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेट, आझाद मैदान, मुंबई
२७) अध्यक्ष, शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर मुंबई
२८) अध्यक्ष, महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, २०२ मातोश्री टॉवर, दुसरा मजला, पद्माबाई ठक्कर मार्ग, माटूंगा (प), मुंबई
२९) सहसचिव (विशा-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३०) निवडनस्ती- विशा-२